**राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मूलभूत/पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजूरी देण्याबाबत सन २०१६-१७.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ग्राक्षेवि- २०१६/प्र.क्र.१५१/का.९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:-११ जानेवारी, २०१७.

वाचा -

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र: ग्राक्षेवि- २०१५/प्र.क्र.७७/ का.९, दि.२२ सप्टेंबर, २०१५.
२) शासन पूरकपत्र,अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.६/का.९, दि. ९ मार्च, २०१६.
३) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१६/प्र.क्र. ८९/अर्थसंकल्प-३, दि. २० एप्रिल, २०१६.
४) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बीयुडी- २०१५/प्र.क्र. ४३ (भाग-३)/ का-७, दि. २० एप्रिल, २०१६.
५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. ग्राक्षेवि-२०१६/प्र.क्र.९४/का-९, दि. २० जुलै, २०१६.
६) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. ग्राक्षेवि-२०१६/प्र.क्र.१३४/१६/का-९, दि. २८ डिसेंबर, २०१६.
७) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. ग्राक्षेवि-२०१६/प्र.क्र.१५१/का-९, दि. ६ जानेवारी, २०१७.
८) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, अविवि-२०१६/प्र.क्र.१०६/का.७, दि. ४ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना:-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत/ पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन ग्रामीण भागात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक लोकसमुहातील नागरिकांच्या जीवनमानाचा दर्जा उंचावण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ या वर्षासाठी ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. २ येथील शासन पूरकपत्रान्वये, दि. २२ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयातील योजनेची कार्यपध्दती या शीर्षाखाली परिच्छेद (क) (iii) च्या पुढे परिच्छेद दाखल करण्याचा निर्णय शासन मान्यतेने घेतला आहे. त्यानुसार मा. खासदार व आमदार तसेच जिल्हाधिकारी यांच्याकडून शासन मान्यतेसाठी प्राप्त ग्रामपंचायत प्रस्तावांना मंजूरी देऊन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१६-१७ करिता रु. ३५,५५,००,०००/- (अक्षरी रू. पस्तीस कोटी पंचावन्न लक्ष फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित आणि संदर्भ क्र. ८ येथील शासन निर्णयान्वये रू. ६,५६,७८,७५०/-(अक्षरी रू. सहा कोटी छप्पन लक्ष अठ्ठ्याहत्तर हजार सातशे पन्नास

फक्त) निधी पुनर्विनियोजित करण्यात आला आहे. माहे एप्रिल, २०१६ ते डिसेंबर, २०१६ करिता सदर मंजूर निधीच्या ८०% मर्यादेपर्यंत निधी वितरीत करण्यासाठी संदर्भ क्र. ३ व ४ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेल्या आहेत. संदर्भ क्र. ५, ६ व ७ येथील शासन निर्णयान्वये एकूण रू.२८,४३,५४,०००/- (अक्षरी रू. अठ्ठावीस कोटी त्रेचाळीस लक्ष चोपन्न हजार फक्त) निधी वितरीत करण्यात आला आहे. मा. खासदार व आमदार तसेच जिल्हाधिकारी यांच्याकडून शासनास प्राप्त झालेल्या ग्रामपंचायतींचे प्रस्ताव या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट- “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे रु. ६०,००,०००/- (अक्षरी रू.साठ लक्ष फक्त) ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत अनुदान मंजूर करण्यात येत असून हे अनुदान संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांचेमार्फत संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

२. संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी, नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविलेली कामे इतर योजनेतून करण्यात आलेली नाहीत, याची शहानिशा व खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी व जर सदर काम इतर योजनेतून मंजूर केले असल्यास त्या बदल्यात इतर काम मंजूर निधीच्या मर्यादेत राहून बदल करण्याचे अधिकार संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना राहतील. उपरोक्त कामाच्या बदल्यात इतर काम करणे शक्य नसल्यास त्यासाठी वितरीत केलेला निधी शासन जमा करण्यात यावा. तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त कामांचे अंदाजपत्रक बांधकाम विभागाकडून प्राप्त करून घ्यावे. याबाबतची सर्व कागदपत्रे शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार प्राप्त करून घेण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी. त्यानंतर त्यांना प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात यावी व निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सुपूर्द करण्यात यावा.

३. ज्या विवक्षीत प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित ग्रामपंचायतींनी निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबंधित जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांच्याकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर ग्रामपंचायतींनी प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट - ब मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

४. या योजनेंतर्गत होणारा खर्च “मागणी क्र. झेड ई-१, २२३५ -सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२- समाजकल्याण, १९८- ग्रामपंचायतींना सहाय्य, राज्य योजनांतर्गत योजना, ०१ अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (०१) अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२२३५ बी ०८५)” या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

५. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६ प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. ”

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११११३५७०७१६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashikant R Salunkhe

Digitally signed by Shashikant R Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f496781d7330d61b41c4ca6211158b72d2ab6bf15878cd9312f9d41519ea160, cn=Shashikant R Salunkhe
Date: 2017.01.11 14:03:29 +05'30'

**( श.र.साळुंखे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मंबई,
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
११) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२) अर्थसंकल्प शाखा (का.७), अविवि, मंत्रालय, मुंबई,
१३) निवडनस्ती (कार्यासन-९).

**शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. ग्राक्षेवि- २०१६/प्र.क्र. १५१/का.९,**
**दि.११ जानेवारी, २०१७.**

**परिशिष्ट - "अ"**

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | कामाचे नांव | मंजूर निधी (रू. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| १ | जालना | भोकरदन | अनवा | स्मशानभूमीची संरक्षण भिंत बांधकाम करणे | १५.०० |
| | | | लतेपूर | शादीखाना बांधकाम करणे | १५.०० |
| | | | शिपोरा | शादीखाना बांधकाम करणे | १५.०० |
| | | | जवखेडा (बु.) | स्मशानभूमीची संरक्षण भिंत बांधकाम करणे | १५.०० |
| | | | | **एकूण (जालना जिल्हा)** | **६०.००** |
| | | | | **अक्षरी रू. साठ लक्ष फक्त** | |

Shashikant R Salunkhe

Digitally signed by Shashikant R Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f496781d7330d61b41c4ca6211158b72d2ab6bf15878cd9312f9d41519ea160, cn=Shashikant R Salunkhe
Date: 2017.01.11 14:05:30 +05'30'

( श.र.साळुंखे )
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. ग्राक्षेवि- २०१६/प्र.क्र. १५१/का.९, दि. ११ जानेवारी, २०१७.**

**परिशिष्ट - "ब"**

**उपयोगिता प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. **ग्राक्षेवि-२०१६/प्र.क्र.१५१/का.९,दि.११ जानेवारी, २०१७** अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| ग्रामविकास अधिकारी / ग्रामसेवक, संबंधित ग्रामपंचायत यांची स्वाक्षरी | मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |